कोरोना वायरस परिस्थितीमुळे स्थलांतरित मजूरांना शासकीय शाळेत राहण्याची सुविधा उपलब्ध करून देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रिडा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०२० /प्र.क्र.६३/एस.डी.२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: २७ मार्च, २०२०.

## परिपत्रक

राज्यातील कोरोना आजाराच्या फैलावामुळे "Lockdown" जाहीर करण्यात आला आहे. विविध व्यवसाय बंद झाल्यामुळे हजारो मोल मजूरी करणारे कामगार कामाविना राहिले असून ते त्यांच्या मुळ गावी परत जाण्याचा मार्ग शोधत आहेत. शासनाने राज्यातील सर्व शाळा बंद करण्याचा निर्णय यापूर्वीच घेतला आहे. त्यामुळे राज्यातील सर्व शाळामध्ये विद्यार्थी शिकण्यासाठी येत नाहीत. त्यामुळे शाळा आसरा (Shelter) देण्यासाठी उपलब्ध आहेत. अशा परिस्थितीत मोलमजूरांना तात्पुरता आधार /आसरा (Shelter) देण्यासाठी या शासकीय/ स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळामध्ये तात्पुरत्या स्वरुपात त्यांची राहण्याची सोय करण्यास परवानगी देण्यात येत आहे.

२. जिल्हा परिषद तसेच, संबंधित महानगरपालिका/नगरपालिका मधील शिक्षण अधिकाऱ्यांना सूचना देण्यात येत आहेत कि, त्यांनी तातडीने वरील सूचना, सर्व संबंधितांचे निदर्शनास आणाव्यात व स्थलांतरित होणाऱ्या मोल मजूरांना शासकीय/ स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळेत तात्पुरता आसरा (Shelter) उपलब्ध करून द्यावा. शाळाची निवड करताना संबंधित जिल्हाधिकारी यांच्या सल्याने करावी. तसेच, त्यांना शक्य त्या इतर आवश्यक सोई सुविधा उपलब्ध करून द्याव्यात. सदर सुविधा "Lockdown" संपेपर्यंत उपलब्ध करून देण्यात याव्यात.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००३३०१५०७४६९६२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2020.03.30 15:10:50 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सर्व विभागीय आयुक्त

२) मा. आयुक्त (शिक्षण)

३) सर्व शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक)

४) अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे

५) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक

६) सर्व जिल्हाधिकारी

७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

८) सर्व शिक्षण अधिकारी (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक)

९) सर्व सह सचिव/ उप सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय

१०) निवडनस्ती.